**सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत सर्व शासकीय/ अनुदानित वसतिगृहे, शासकीय/ अनुदानित आश्रमशाळा, अपंगांसाठीच्या विशेष शाळा/ कार्यशाळा, विजाभज आश्रमशाळांमध्ये प्रवेशित सर्व विद्यार्थ्यांचे आधार ओळखपत्र तयार करुन घेण्याबाबत (दिनांक २२ जून २०१५ ते ३१ जुलै २०१५ मोहीम)**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१५/प्र.क्र.१२८/शिक्षण-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक: १६ जून, २०१५

**प्रस्तावना -**

भारतीय नागरिकांना सार्वजनिक ओळखपत्र आधारकार्डच्या माध्यमातुन देण्याचा उपक्रम केंद्रशासनामार्फत राबविला जात आहे. सदर आधार कार्ड हे प्रत्येक व्यक्तीला दैनंदिन व्यवहारात तसेच खाजगी व सार्वजनिक जीवनात उपयुक्त ठरत आहे. ही बाब विचारात घेता सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत सर्व अनुसूचित जाती शासकीय/ अनुदानित वसतिगृहे, शासकीय/ अनुदानित आश्रमशाळा, अपंगांसाठीच्या विशेष शाळा /कार्यशाळा तसेच विजाभज आश्रमशाळांमध्ये प्रवेशित सर्व विद्यार्थ्यांचे आधार ओळखपत्र तयार करण्याच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत सर्व अनुसूचित जाती शासकीय/ अनुदानित वसतिगृहे, शासकीय/ अनुदानित आश्रमशाळा, अपंगांसाठीच्या विशेष शाळा /कार्यशाळा तसेच विजाभज आश्रमशाळांमध्ये प्रवेशित सर्व विद्यार्थ्यांचे आधार ओळखपत्र तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

१. प्रत्येक जिल्ह्याच्या संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी/ सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी जिल्ह्यात कार्यरत असलेल्या सर्व अनुसूचित जाती शासकीय/ अनुदानित वसतिगृहे, शासकीय/ अनुदानित आश्रमशाळा, अपंगांसाठीच्या विशेष शाळा /कार्यशाळा तसेच विजाभज आश्रमशाळांची यादी अद्ययावत करावी. त्यात संस्थेचे नाव, पत्ता, संपर्क क्रमांक, ई-मेल आयडी, मंजूर व प्रवेशित विद्यार्थी संख्या, त्यांचे उपस्थितीपत्रक, इ. माहिती असणे आवश्यक आहे.

२. उपरोक्त सर्व शासकीय, निमशासकीय, स्वयंसेवी संस्थांच्या अधीक्षक/ गृहपालांवर/ मुख्याध्यापकांवर सर्व प्रवेशित विद्यार्थ्यांचे आधार ओळखपत्र बनविण्याची/ बनवून घेण्याची जबाबदारी निश्चित करण्यात यावी. त्यासाठी त्यांना संबंधित संस्थेचा संपर्क अधिकारी म्हणून घोषित करण्यात यावे.

३. संबंधित अधीक्षक/ गृहपाल/ मुख्याध्यापकाने संस्थेतील सर्व प्रवेशितांची नावे, वय, लिंग, पत्ता, पालक व आधार ओळखपत्र तयार करण्यास आवश्यक असलेल्या इतर सर्व माहितीची अद्ययावत यादी तयार करावी.

४. वरीलप्रमाणे सर्व तयारी केल्यानंतर संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी/ सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी जिल्ह्यातील आधार ओळखपत्र वितरीत करणाऱ्या संबंधित जिल्ह्याच्या प्रमुख यंत्रणेशी संपर्क साधून संस्थानिहाय आधार ओळखपत्र तयार करण्यासाठी दिनांक निश्चित करुन तयार केलेल्या यादीनुसार कागदपत्रे अद्ययावत ठेवून आधार ओळखपत्र बनविण्याची कार्यवाही करावी.

५. संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी/ सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी सदर कार्यक्रम "अभियान" धर्तीवर राबवावा. आधार ओळखपत्र बनविण्याचे सदर अभियान **दिनांक २२ जून २०१५ ते ३१ जुलै २०१५** या कालावधीत पूर्ण करण्याची कार्यवाही करण्यात यावी. सदर प्रकरणी वेळेचा अपव्यय होऊ नये, यासाठी पूर्ण तयारी काळजीपूर्वक करावी.

६. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग यांना सूचित करण्यात येते की, त्यांनी सदर कार्यक्रमात समन्वयकाची भूमिका बजावावी व याकामी संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी/ सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना आवश्यक ते सहकार्य करावे. तसेच, त्यांनी आपापल्या विभागातील सर्व अनुसूचित जाती शासकीय/ अनुदानित वसतिगृहे, शासकीय/ अनुदानित आश्रमशाळा, अपंगांसाठीच्या विशेष शाळा /कार्यशाळा तसेच विजाभज आश्रमशाळांमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांचे आधार ओळखपत्र काढण्यात आले असल्याचे प्रमाणपत्र आयुक्त, समाजकल्याण, पुणे/ आयुक्त, अपंगकल्याण, पुणे/ संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे यांना सादर करावे. त्यानुसार, आयुक्त/संचालकांनी त्यांच्याशी संबंधित विद्यार्थ्यांबाबत एकत्रित अहवाल दि.१४/०८/२०१५ पर्यंत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१७२४५८७१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: CN = Dinesh Ramchandra Dingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.18 16:44:53 +05'30'

(दि.रा.डिंगळे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.मंत्री/राज्यमंत्री, सामाजिक न्याय, यांचे खासगी सचिव
४. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
७. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त, अपंगकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.सर्व विभागीय आयुक्त (महसूल)
११.सर्व जिल्हाधिकारी
१२.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१३.सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
१४.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१५.सर्व सह सचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष
१६.सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.निवड नस्ती.